पटकी नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे-१ कार्यालयातील ३ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पटकी-२०१९/अपदे/प्र.क्र.२३३/आरोग्य-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: १५ सप्टेंबर,२०२०

**संदर्भ :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१ दि.०६/०८/२००७.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : पटकी-२०१९/अपदे/प्र.क्र.२३३/आ-५ दि.१६.०३.२०२०.
३) वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक:पदनि-२०१६/प्र.क्र८/१६/आ.पु.क.,दि.३१.०८.२०२०.
४) संचालक, आरोग्य सेवा , पुणे यांचे पत्र क्र.संआसे/आस्था/नकक्ष-५५क/३अस्थायीपदे/४२६१७-१८/२०२० दि.११.०८.२०२०

**<u>शासन निर्णय :-</u>**

पटकी नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सहसंचालक, आरोग्य सेवा (हि.ह. व ज.रो.), पुणे येथे कार्यरत असलेली खाली नमूद केलेली ३ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत वरील अनु.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये पुढे चालू ठेवण्यात आली होती. सदर मुदत दि.३१.०८.२०२० रोजी संपुष्टात आली आहे. सदर पदे राज्यातील जनतेस आरोग्य विषयक सेवा सातत्याने उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने आवश्यक असल्याने, सदर ३ अस्थायी पदे दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पदनाम | तात्पुरते पद प्रथम निर्माण केलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक | अस्थाई पदांची संख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|
| १ | वरिष्ठ स्वच्छता निरिक्षक (आरोग्य पर्यवेक्षक) (गट-क) | साआवि, शा.नि., क्र. ईडीए-१०८५/ सीआर-३५//आरोग्य-६, दि.२३/८/१९८५ | १ | पीबी-२ (९३००-३४८००) + ग्रेड पे ४२०० |
| २ | लिपिक-नि-टंकलेखक (गट-क) | साआवि, शा.नि., क्र. ईडीए-१०८५/ सीआर-३५//आरोग्य-६, दि.२३/८/१९८५ | १ | पीबी-१ (५२००-२०२००) + ग्रेड पे १९०० |
| ३ | चतुर्थश्रेणी कर्मचारी (गट-ड) | साआवि, शा.नि., क्र. ईडीए-१०८५/ सीआर-३५//आरोग्य-६, दि.२३/८/१९८५ | १ | १-एस (४४४०-७४४०) + ग्रेड पे १३०० |
| | **एकूण** | | **३** | |

२. वरील पदांवरील खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ करीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक : १ आर**
**२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,**
**०६-सार्वजनिक आरोग्य,**
**१०१- रोग प्रतिबंध व नियंत्रण ,**
**(०१) रोग प्रतिबंध व नियंत्रण,**
**(०१) (०६) पटकी नियंत्रण कार्यक्रम,**
**सांकेतांक २२१० ०६२९ (अनिवार्य)**

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.३१०८.२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९११२१२२२८५३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN VASANTRAO WAHUL

Digitally signed by KIRAN VASANTRAO WAHUL
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=58e32592d7ee16b3f0ea3e5db304272db056899514ece7f762990f9b1a0c5049,
postalCode=400001,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=2e35734ec976bf5657815fb42c4d25b0b3c23b4c69600638f3deb172ac9e37f4,
ou=PHD, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=KIRAN VASANTRAO WAHUL
Date: 2020.09.18 15:26:30 +05'30'

**(किरण वाहूल)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत**,**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई०
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३) सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई/पुणे
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (हि.ह. व ज.रो.), पुणे-१/६.
५) उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७) लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०) वित्त विभाग, व्यय-१३, अर्थसंकल्प-३, अर्थसकल्प-९, आ.पु.क., मंत्रालय, मुंबई.
११) सार्वजनिक आरोग्य विभाग, अर्थसंकल्प शाखा, लेखा, सेवा-१, सेवा-५, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती (आरोग्य-५).